रस्ता सुरक्षा निधीसाठी स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास मंजूरी देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमव्हीआर-०८१६/प्र.क्र.४५७/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०९ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि.१ सप्टेंबर, २०१६.
२) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि.२१ ऑक्टोबर, २०१६.
३) परिवहन सहआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/कार्या-४/ स्वी.प्र.खा. / न.क्र.१६२७०, दि.६ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. २९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा समिती स्थापन केली आहे. सदर रस्ता सुरक्षा समितीने दिलेल्या सूचनांनुसार रस्ता सुरक्षा विषयक कामकाजासाठी संदर्भाधिन दिनांक १/९/२०१६ च्या शासन निर्णयान्वये “रस्ता सुरक्षा निधी” स्थापन करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच उक्त सुरक्षा निधीकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यास संदर्भाधिन दिनांक २१/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर सुरक्षा निधीकरीता स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील रस्ते अपघातावर प्रभावीरित्या उपाययोजना करण्यासाठी संदर्भाधिन दिनांक १/९/२०१६ च्या शासन निर्णयान्वये “रस्ता सुरक्षा निधी” स्थापन करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला असून सदर निधीचा विनियोग करण्यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा (PLA) खाते उघडण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर स्वीय प्रपंजी लेखा खाते महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ नियम १ (४) मधील स्वीय प्रपंजी लेख्याशी संबंधित सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याच्या अधिन राहून उघडण्यास मान्यता देण्यात येत येईल.
२) सदर स्वीय प्रपंजी लेखा खात्याचे लेखा परिक्षण महालेखापाल कार्यालयाकडून वेळोवेळी करून घेण्यात येईल.
३) सदर स्वीय प्रपंजी लेख्याबाबत तपशीलवार लेखे ठेवणे, विहीत नियतकालीक विवरणे महालेखापाल यांना सादर करण्याची जबाबदारी परिवहन आयुक्त यांची राहील.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी अधिदान व लेखा कार्यालयाच्या लेख्याबरोबर खर्चाचा ताळमेळ घालण्यात येईल.
५) सदरहू सदर स्वीय प्रपंजी लेखामध्ये “रस्ता सुरक्षा निधी” या व्यतिरीक्त इतर महसुली खर्च किंवा महसूली जमा करता येणार नाही.

६) महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम ४९५ परिच्छेद ३ मधील नमूद तरतूदीनुसार सदर स्वीय प्रपंजी लेख्याचा त्या-त्या आर्थिक वर्षांमधील जमा-खर्चाचा ताळेबंद ठेवण्यात यावा.

७) महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील स्वीय प्रपंजी लेखा (PLA) संदर्भात नमूद नियम व सर्व अटीचे अनुपालन आवश्यक राहील.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३५/१६ / कोषा प्रशा ५, दि. ३ जानेवारी, २०१७ व महालेखापाल-१, महाराष्ट्र मुंबई यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. TM/Ch२ UOR / Home Department / २०१६-१७/१७७६, दि.२५ जानेवारी, २०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०२०९१५२९४५७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Ghiratkar Nitin Jyotinath

Digitally signed by Ghiratkar Nitin Jyotinath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, cn=Ghiratkar Nitin Jyotinath
Date: 2017.02.09 15:58:11 +05'30'

( नि.ज्यो.घिरटकर )
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७. मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
९. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१०.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१५.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७.निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई.

१८.वित्त विभाग (व्यय -८/कोषा-५ /अर्थसंकल्प-११/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१९.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई .
२०.संबधित मंत्रालयीन विभाग.
२१.निवडनस्ती/परिवहन-२.